नागरी सहकारी बँकांना एकरकमी कर्ज परतफेड योजना सन २०१४-२०१५ लागु करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९ (अ)/७-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक- २१.०१.२०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १०.०३.२००८
२) शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०३.२००८
३) शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०९.२०११
४) शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २३.०५.२०१२
५) शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २५.०९.२०१३

**प्रस्तावना:-**

राज्यातील नागरी सहकारी बँकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास शिफारस केलेली एक रकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास शासनाने उपरोक्त शासन निर्णय क्र. १ प्रमाणे मंजूरी दिलेली होती.

अनुक्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये नागरी सहकारी बँकांची एक रकमी कर्ज परतफेड योजना पुढे दि. ३१.३.२०१४ पर्यंत चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात आलेली आहे. नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी करण्याच्या दृष्टीने एक रकमी कर्ज परतफेड योजना ही चांगली असून सदर योजनेस वेळोवेळी मुदतवाढ दिल्यामुळे नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी होण्यास आतापर्यंत मदतच झालेली आहे. ही बाब लक्षात घेऊन सदरहू योजनेस मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

नागरी सहकारी बॅकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शिफारस केलेल्या एक रकमी कर्ज परतफेड योजनेस मंजूरी द्यावी असा शासनाने निर्णय घेतलेला असून, शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णय सोबतच्या परिशिष्ट “अ” मधील एक रकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास शासन मंजूरी देत आहे. ही योजना राबविण्यात यावी म्हणून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम-१५७ नुसार प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन शासन महाराष्ट्रातील नागरी सहकारी बँकांना भारतीय रिझर्व्ह बँकेच्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून ही योजना अंमलात आणण्यापुरती महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१ च्या नियम ४९ मधील तरतुदीमधून सूट देत आहे. तसेच या योजनेला स्थायी आदेशाचे स्वरुप देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय अंमलात आल्यानंतर वरील वाचावे येथील क्रमांक १ ते ५ चे शासन निर्णय हे रद्द समजण्यात यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२२१०३०५६१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.01.22 10:41:37 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रत,**

१. सर्व मा. विधान सभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
२. मुख्य महाव्यवस्थापक (नागरी बँका), भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८.
३. उप मुख्य सरव्यवस्थापक, भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी व सचिव, दि महाराष्ट्र अर्बन को.ऑप.बँक फेडरेशन,लि.,भारतीय क्रिडा मंदिर,४ था मजला,पीबीनं ७१२०,वडाळा,मुंबई-०३१.
८. अध्यक्ष, दि महाराष्ट्र अर्बन को. ऑप. बँक असोसिएशन लि. मुंबई.
९. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहु शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी द्यावी.
१०.निवड नस्ती.

प्रत माहितीस्तव:-

१. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्विय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२. संग्रहार्थ

## परिशिष्ट अ

## नागरी सहकारी बँकांसाठीच्या एक रकमी कर्ज परतफेड योजना सन २०१४-२०१५ च्या मार्गदर्शक सूचना

**१. पात्रता :-**

अ. या मार्गदर्शक सूचना दिनांक ३१/३/२०११ अखेर जी कर्जखाती अनुत्पादक कर्जाच्या संशयीत (Doubtful) किंवा बुडीत (Loss) वर्गवारीत समाविष्ट केलेली असतील अशा सर्व कर्जांना ही योजना लागू राहील.

ब. ही योजना दि.३१/३/२०११ रोजी substandard वर्गवारीत समाविष्ट झालेल्या व नंतर संशयीत व बुडीत वर्गवारीत गेलेल्या कर्जखात्यांना देखील लागू राहील.

क. ही योजना खालील कर्जांना लागू राहणार नाही.

i) फसवणूक, गैरव्यवहार करुन घेतलेली कर्जे व रकमा तसेच जाणीवपूर्वक थकविलेली कर्जे

ii) संचालक व त्यांचे नातेवाईकांनी घेतलेल्या किंवा जामीन दिलेली किंवा संचालकांशी संबंधीत फर्मस / कंपन्या / संस्थांची कर्जे ( रिझर्व्ह बँकेच्या पूर्व मान्यतेने सदर योजनेचा लाभ देण्यात येईल.)

ड. आर. बी. आय. ने दिलेल्या निकषांच्या मर्यादेत दिलेली कर्जे या योजनेसाठी पात्र राहतील.

**२. तडजोडीचे सूत्र - कमीत कमी वसूल करावयाची रक्कम :-**

**अ.** दिनांक ३१/३/२०११ अखेर संशयीत अथवा बुडीत वर्गवारीत असलेली एन.पी.ए. कर्ज खाती ज्या तारखेस कर्जखाते संशयीत कर्जाच्या वर्गवारीत वर्गीकृत केले असेल त्या तारखेची व्याजासह १००% येणेबाकी.

**ब.** दि.३१/३/२०११ अखेर सबस्टॅन्डर्ड असलेली व नंतर संशयीत अथवा बुडीत वर्गवारीत आलेली एन.पी.ए. कर्जखाती. कर्जखाते ज्या तारखेस संशयीत वर्गवारीत आले असेल त्या तारखेची व्याजासह १००% येणे बाकी. कर्ज संशयीत झाल्याचे तारखेनंतर बँकेस प्राप्त झालेल्या रकमेचा हिशोब कर्ज खात्याची तडजोड करताना विचारात घेण्यात येईल.

(उदा. एका कर्ज प्रकरणात दिनांक ३१/३/२००४ (संशयीत झाल्याची तारीख) रोजी मुददल रु.१००/- व व्याज रु.४०/- येणे आहे. या कर्जखात्यात दि.३१/३/२००४ नंतर रु.२०/- इतका भरणा झाला आहे. मात्र ही रक्कम त्यानंतरच्या काळात आकारलेल्या व्याजामध्ये वर्ग झाली असल्याने रु.१२०/- वसूल करावयाचे आहेत.)

मात्र कोणत्याही परिस्थितीत वसूल करावयाची किमान रक्कम ही अंतीम भरणा करण्याचे तारखेस खात्यात येणे मुददल असलेल्या रकमेपेक्षा कमी नसेल.

(उदा. एका कर्ज प्रकरणात दिनांक ३१/३/२००४ (संशयीत झाल्याची तारीख) रोजी मुददल रु.१००/- व व्याज रु.४०/- येणे आहे. या कर्जखात्यात दिनांक ३१/३/२००४ नंतर रु.६०/- इतका भरणा झाला आहे. मात्र ही रक्कम त्यानंतरच्या काळात आकारलेल्या व्याजामध्ये वर्ग झाली असल्याने मुददल रु.१००/- येणे दिसत आहे. अशा ठिकाणी किमान रु.१००/- वसूल करावयाचे आहेत.)

वर नमूद केलेली रक्कम ही बँकांनी कमीत कमी वसूल करावयाची रक्कम असून बँकेच्या आर्थिक स्थितीप्रमाणे त्यांना त्यावर व्याज अपेक्षित असल्यास संशयीत झालेल्या दिनांकानंतर देखील उपरोक्त अ व ब बाबत व्याज आकारण्याचे स्वातंत्र्य बँकेस राहील. मात्र बँकांना यामध्ये त्यांचे सभासदांमध्ये भेदभाव करता येणार नाही.

**क.** दिनांक ३१/३/२००८ रोजी किंवा तत्पुर्वी जी कर्जखाती संशयीत ३ (doubtful ३) किंवा बुडीत (loss) या प्रकारात वर्गीकृत केली असतील व त्या कर्जखात्यांची नफा तोटा पत्रकामध्ये १००% तरतूद केली असेल अशा क्रॉनिक कर्जखात्यांवर कर्जखाते ज्या दिनांकास संशयीत ३ (doubtful ३) किंवा बुडीत (loss) या प्रकारात वर्गीकृत केले असेल त्या दिनांका अखेरची येणे बाकी (Ledger Balance) एवढी रक्कम वसूल करण्यात यावी. सदर कर्ज खात्यावर संशयीत ३ (doubtful ३) किंवा बुडीत (loss) च्या दिनांकानंतर व्याज वसूल करण्यात येणार नाही".

## ३. बँकांनी पाळावयाची बंधने :-

सदर योजना स्विकारणे बँकांवर बंधनकारक नाही. मात्र सदर योजना स्विकारल्यानंतर ती सर्व कर्जदारांमध्ये कोणताही भेदभाव न करता समान पध्दतीने लागू करण्याचे बंधनकारक राहील.

सदरची योजना बँकांना त्यांची अनुत्पादक कर्जे त्वरेने वसूल करण्याच्या उददेशाने निर्गमित करण्यात येत असून कोणत्याही कर्जदारास याबाबत हक्क सांगता येणार नाही.

एन.पी.ए. ची तारीख व वर्गवारी बँकेच्या दप्तराप्रमाणे व लेखापरीक्षकांनी प्रमाणीत केल्याप्रमाणे निश्चित करण्यात येईल. कर्ज रकमेतील अथवा कर्ज मंजूरी तसेच तत्सम बाबींमधील वाद महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ९१ अंतर्गत सोडविण्याची तरतूद आहे. त्या प्रमाणे सदर योजनेबाबत कर्जदार व बँक यांचेमध्ये काही वाद निर्माण झाल्यास त्याबाबत संबंधीत तरतुदीप्रमाणे कार्यवाही अपेक्षित आहे.

सदर कर्ज परतफेड योजनेअंतर्गत कर्ज खाते बंद करताना संबंधीत कर्जदारास नव्याने कर्ज / सवलत देता येणार नाही. तसेच सदर कर्जदारास पुढील ५ वर्षापर्यंत बँकेकडून कोणत्याही प्रकारची कर्ज / सवलत घेता येणार नाही तसेच तो बँकेतील कोणत्याही कर्जास / सवलतीस ५ वर्षे जामीन राहू शकणार नाही.

## ४. परतफेड करण्यासाठी कालावधी :-

एक रकमी कर्ज परतफेड योजना कर्जदारास मंजूर केल्यानंतर कर्जदाराने किमान २५% रक्कम मंजूरीच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत व उर्वरीत रक्कम जास्तीत जास्त ११ मासिक हप्त्यात भरणे आवश्यक आहे.

कर्जदाराने सुरुवातीस भरावयाची रक्कम २५% हून कमी करणेबाबत संचालक मंडळास त्यांचे स्तरावर निर्णय घेण्याबाबत अधिकार असेल. मात्र कोणत्याही परिस्थितीत संपूर्ण रक्कमेचा भरणा ११ महिन्यात पूर्ण होणे आवश्यक आहे.

कर्जदाराने परतफेड योजनेसाठी करावयाच्या अर्जाबरोबर किमान ५% रक्कम भरणे आवश्यक आहे. मात्र बँकेच्या संचालक मंडळास यामध्ये सूट देण्याबाबत स्वातंत्र्य असेल.

कर्ज परतफेड योजना मंजूरीच्या दिनांकापासून कर्ज पूर्ण परतफेड होण्याच्या दिनांकापर्यंत बँकेने किमान १०% दराने व्याज आकारणी करावी.

**५. योजनेची मुदत :-**

या योजनेची मुदत दिनांक ३१ मार्च २०१५ पर्यंत राहील. दिनांक २८/२/२०१५ पर्यंत प्राप्त अर्जांवर दिनांक ३१ मार्च २०१५ पर्यंत कार्यवाही करणे आवश्यक आहे.

--------------------